**विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे कार्यालयातील विविध संवर्गातील ५२ पदे समर्पित करून "पोलीस उप अधिक्षक" व "पोलीस निरिक्षक" या संवर्गातील एकूण २० पदे निर्माण करण्यास मान्यता देणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अेपीओ-३६२०/प्र.क्र.६८/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई

दिनांक : ०५ जून, २०२३.

वाचा :-

१) गृह विभाग,शासन निर्णय क्र.अेपीओ-३६१६/प्र.क्र.१६५/पोल-३,दि.४/३/२०१७.

२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/सायबर/पदे समर्पित/रुपांतरीत/३८/२०२२,दि.१७/५/२०२२.

३) उच्च स्तरीय सचिव समितीच्या दि.१३/१२/२०२२ रोजी पार पडलेल्या सन २०२२ मधील ५ व्या बैठकीचे इतिवृत्त.

प्रस्तावना :-

गृह विभाग, शासन निर्णय दि.०४/०३/२०१७ च्या निर्णयाव्दारे, संचालक, नागरी संरक्षण संचालनालय, म.राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवरील अधिकारी/कर्मचारी यांची एकूण १०९ पदे ही विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या आस्थापनेवर स्थानांतरणाने उपलब्ध करून दिलेली आहेत.

२. उक्त शासन निर्णयामध्ये नमूद करण्यात आलेल्या स.पो. उपनिरीक्षक -४, कनिष्ठश्रेणी लिपीक-२७, सहा. दस्तऐवज परीक्षक-१, प्रयोगशाळा परीचर-८, कार्यालयीन शिपाई-२, सफाईगार-६ व रखवालदार-४ अशी एकूण ५२ पदांची विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयास आवश्यकता नसल्याने, उपरोक्त ५२ पदे ही समर्पित करुन, त्याऐवजी ५ पोलीस उप अधीक्षक व १५ पोलीस निरीक्षक यांची पदे निर्माण करण्यात यावीत, अशी विनंती पोलीस महासंचालक कार्यालयाने संदर्भीय क्र. २ येथील दि.१७/५/२०२२ च्या पत्राव्दारे शासनास केली आहे.

३. त्यानुषंगाने उक्त संदर्भ क्र.३ येथील दि.१३/१२/२०२२ रोजी मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे अध्यक्षतेखाली पार पडलेल्या सन २०२२ मधील ५ व्या उच्च स्तरीय सचिव समितीच्या बैठकीच्या इतिवृत्तानुसार समितीने दिलेली मान्यता विचारात घेवून, शासनाने याप्रकरणी खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u>:-**

विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे कार्यालयातील खालीलप्रमाणे **तक्ता-अ** येथील विविध संवर्गातील एकूण ५२ पदे रूपांतरित/समर्पित करून, त्याऐवजी गट-अ संवर्गातील खालीलप्रमाणे **तक्ता-ब** येथील एकूण २० पदे निर्माण करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**अ) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध या कार्यालयातील समर्पित करावयाच्या एकूण ५२ पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहेत,**

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या |
|---|---|---|
| १ | सहायक पोलीस उपनिरिक्षक | ०४ |
| २ | कनिष्ठ श्रेणी लिपिक | २७ |
| ३ | सहायक दस्तऐवज परिक्षक | ०१ |
| ४ | प्रयोगशाळा परिचर | ०८ |
| ५ | कार्यालयीन शिपाई | ०२ |
| ६ | सफाईगार | ०६ |
| ७ | रखवालदार | ०४ |
| **एकूण** | | **५२** |

**ब) उक्त ५२ पदे समर्पित केल्यानंतर नवीन निर्माण करावयाची २० पदांचा तपशील खालीलप्रमाणे आहेत,**

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | पोलीस उप अधीक्षक | S-२०:५६१००-१७७५०० | ०५ |
| २ | पोलीस निरिक्षक | S-१८:४९१००-१५५८०० | १५ |
| **एकूण नियमित पदे** | | | **२०** |

२. उक्त "**तक्ता-ब**" येथील नमूद एकूण २० पदासांठी येणारा रू.२,०२,३३,३२० /-(अक्षरी रु दोन कोटी दोन लाख तेहतीस हजार तीनशे वीस फक्त) इतका वार्षिक आवर्ती खर्च हा गृह विभाग, मागणी क्र.बी-१,२०५५, पोलीस १०१, गुन्हे अन्वेषण व दक्षता (००) (०६) सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध कक्ष (२०५५ A ०२३) या लेखाशिर्षाखाली-०१ वेतन मध्ये उपलब्ध मंजूर अनुदानातून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.अनौसं-४०/आपुक/वित्त विभाग, दि.२४/०१/२०२३ व्दारे व उच्च स्तरीय सचिव समितीने दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०५१७२२४४३८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RUPALI SANJOG KABARE

Digitally signed by RUPALI SANJOG KABARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=825ec39543f0d33deccec30f6ca54b1adc430443efec55f07e98dc173423779d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5CB43A03D973FF96AABBF02A74864A4681399FE663D8FBDE0441A596BEB3ACDD, cn=RUPALI SANJOG KABARE
Date: 2023.06.05 17:26:07 +05'30'

**( रुपाली कबरे )**
**कार्यासन अधिकारी, गृह विभाग**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (सेवा), साप्रवि, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव (वित्त),वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
८. विशेष पोलीस महानिरीक्षक,सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध,महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई.
११.सह सचिव (पोल ३),गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
१२.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१३.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१/आ.पु.क.
१४.निवड नस्ती, पोल-३.